रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये राज्यात विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत (Decentralised Procurement Scheme) गहू खरेदी करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांक :- खरेदी- १०२०/प्र.क्र.७५/ना.पु.२९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७ जुलै, २०२०

**वाचा :- शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्र.खरेदी-१०२०/प्र.क.७५/ना.पु.२९, दिनांक १ जुलै, २०२०.**

**प्रस्तावना -**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून शेतकऱ्यांना हमी किंमतीपेक्षा कमी किंमतीने (डिस्ट्रेस सेल) धान्य विकावे लागू नये, म्हणून ही योजना राबविण्यात येते. त्यासाठी राज्य शासनाने नियुक्त केलेल्या अभिकर्ता संस्थांमार्फत (बिगर आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (Markfed) व आदिवासी क्षेत्रात, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक (TDC)) यांच्यामार्फत राज्यात खरेदी प्रक्रिया राबविण्यात येते.

राज्यात केंद्र शासनाची किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत गहू या पिकाची खरेदी केली जाते. तथापि, मागील तीन-चार हंगामांमध्ये राज्यात गव्हाची खरेदी झालेली नाही. रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये दोन्ही अभिकर्ता संस्थांच्या मागणीस अनुसरुन गहू खरेदीचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर केला असता, सदर खरेदी विकेंद्रित खरेदी योजनेखाली (Decentralised Procurement Scheme) करण्याच्या अटीस राहून केंद्र शासनाने गहू खरेदीस परवानगी दिली आहे. त्यानुसार राज्यात रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयान्वये गहू खरेदीसाठी विकेंद्रित खरेदी योजना संपूर्ण राज्यात राबविण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये गहू खरेदी संदर्भात सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत पणन हंगाम २०२०-२१ च्या रब्बी पणन हंगामासाठी केंद्र शासनाने गव्हाचे विहीत विर्निदेश तसेच, किमान आधारभूत किंमती जाहीर केल्या आहेत. त्यानुसार राज्यातील

शेतकऱ्यांना किमान आधारभूत किंमतीचा लाभ मिळावा या हेतूने राज्यात गहू खरेदी केंद्रे उघडण्याकरीता व त्या ठिकाणी किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेखाली विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत गव्हाची खरेदी करण्यासाठी खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

*१) खरेदी बाबत निर्णय:-*

(अ) संपूर्ण महाराष्ट्र राज्यामध्ये केंद्र शासनाची "नोडल एजन्सी" म्हणून भारतीय अन्न महामंडळ (Food Corporation of India) काम पाहील.

(ब) प्रत्यक्ष खरेदीची प्रक्रिया बिगर आदिवासी क्षेत्रात "महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (Markfed)" व आदिवासी क्षेत्रात "महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक (TDC)" या अभिकर्ता संस्थांमार्फत करण्यात यावी.

(क) भारतीय अन्न महामंडळाच्या समन्वयाने राज्य शासनाने कार्यवाही करावयाची आहे. यास्तव महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई व आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांनी राज्यशासनाचे मुख्य अभिकर्ता म्हणून काम पहावे.

(ड) गहू खरेदीच्या स्तरापर्यंतच्या सर्व प्रकारच्या कार्यवाहीची जबाबदारी मुख्य अभिकर्ता संस्थावर राहील.

(इ) खरेदी केलेला गहू अभिकर्ता संस्थांनी स्वत:च्या गोदामांमध्ये साठवावा. रब्बी पणन हंगाम २०२०-२१ साठी केंद्र शासनाने निश्चित केलेले विहित विनिर्देश (Uniform Specifications) सदर गहू खरेदीस लागू असतील. सदर गहू जिल्हा पुरवठा अधिकारी यांचेकडे सुपूर्द करेपर्यंतची सर्व जबाबदारी दोन्ही अभिकर्ता संस्थांची असेल.

(ई) खरेदी केलेला गहू अभिकर्ता संस्थांनी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांचेकडे दर्जा तपासणी व वजन करुन जमा केल्यानंतर, अशा धान्याची साठवणूक, सुस्थितीत ठेवणे, गरजेनुसार जिल्हांतर्गत वाहतूक/धुरीकरण इत्यादीची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी यांची असेल.

**२) अभिकर्ता नेमणूक :-**

उपरोक्त निर्णयानुसार, राज्यात खालीलप्रमाणे :-

I] **बिगर आदिवासी क्षेत्रात**- रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये, किमान आधारभूत किंमत योजनेखाली विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत गहू खरेदी करण्याकरिता, **महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई** (Markfed) या अभिकर्ता संस्थेची या आदेशान्वये **मुख्य अभिकर्ता म्हणून नेमणूक करण्यात येत आहे.** सदर अभिकर्ता संस्थेने या क्षेत्रातील खरेदीची कार्यवाही विहित कालमर्यादेत करण्याची दक्षता घ्यावी.

II] **आदिवासी क्षेत्रामध्ये-** रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत गहू खरेदी करण्याकरिता **महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक** (TDC) या अभिकर्ता संस्थेची या आदेशान्वये **मुख्य अभिकर्ता** म्हणून नेमणूक करण्यात येत

आहे. सदर अभिकर्ता संस्थेने या क्षेत्रातील खरेदीची कार्यवाही विहित कालमर्यादेत करण्याची दक्षता घ्यावी.

**३. गहू खरेदीसाठी जिल्हा समन्वय समिती :-**

जिल्हाधिकारी यांनी जिल्ह्यातील अभिकर्ता संस्थांच्या मदतीने खालीलप्रमाणे जिल्हा समन्वय समिती स्थापन करण्याची कार्यवाही करावी :-

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य |
| जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था | सदस्य |
| मार्केटिंग फेडरेशन/आदिवासी विकास महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक | सदस्य सचिव |

जिल्हा समन्वय समितीने अभिकर्ता संस्थांशी समन्वय राखून उक्त गहू खरेदी प्रक्रिया सुरळीत पार पडले याची दक्षता घ्यावी.

**४) आधारभूत किंमती, सर्वसाधारण गुणवत्ता व दर्जा:-**

(किंमत रुपये/प्रति क्विंटल)

| **अ.क्र .** | **पीक** | **आधारभूत किंमत (रुपये)** | **शेतकऱ्यांना प्रत्यक्ष द्यावयाचा दर ( रुपये )** | **गुणवत्ता दर्जाचे विनिर्देश** |
|---|---|---|---|---|
| १. | गहू (एफ .ए.क्यू) | **१९२५/-** | **१९२५/-** | परिशिष्ट "अ" प्रमाणे |

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेखाली विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या विनिर्देशात बसणारा FAQ दर्जाचा गहू खरेदी करणे आवश्यक आहे. त्यानुसार अभिकर्ता संस्थांनी प्रशिक्षित ग्रेडर्सकडून तपासणीअंतीच गहू खरेदी करावा. कमी दर्जाचा गहू खरेदी झाल्यास व त्यामुळे काही तोटा आल्यास किंवा कोणतीही समस्या उद्भवल्यास अभिकर्ता संस्था पूर्णत: जबाबदार राहतील.

गव्हाच्या खरेदीची दर्जात्मक तपासणी शासनाकडून (जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयातील गुणवत्ता नियंत्रण प्रशिक्षित कर्मचारी) करण्यात येईल. दर्जा संबंधी खरेदी किंवा साठवणूकीच्या वेळी तपासणीमध्ये काही दोष आढळल्यास याबाबत अभिकर्ता संस्था संपूर्णपणे जबाबदार राहील. तसेच यामध्ये प्रकरणपरत्वे सुधारणात्मक कार्यवाही अभिकर्ता संस्थेनेच करावयाची असून अशा कार्यवाहीमुळे झालेल्या नुकसानीस अभिकर्ता संस्था संपूर्णत: जबाबदार असतील.

**५) आर्द्रता:-**

केंद्र शासनाने हंगाम २०२०-२१ करीता आर्द्रतेचे अधिकतम प्रमाण १४% इतके विहित केले आहे. या प्रमाणापेक्षा आर्द्रता जास्त आढळल्यास गहू खरेदी करण्यात येऊ नये. मात्र, आर्द्रता स्विकारल्यानंतर आर्द्रता कटती लावू नये. त्यामुळे अभिकर्ता संस्थांनी शेतकऱ्यांना त्यांच्या गव्हाची पूर्ण आधारभूत किंमत कोणत्याही कटतीशिवाय प्रदान करावी. कोणत्याही स्थितीत जास्त ओलसर किंवा बुरशीयुक्त गहू खरेदी करु नये. गहू स्वच्छ व कोरडा असून ते विक्री योग्य (मार्केटेबल) असल्याचे अभिकर्त्याने खातरजमा करावी. विहीत प्रमाणापेक्षा जास्त आर्द्रता असलेला गहू खरेदी केल्यास अभिकर्ता संस्थांनी वेळीच संबंधितांवर दंडात्मक कारवाई करावी.

**६) सर्वसाधारण अटी व शर्ती:-**

६.१. खरेदी केंद्रावर खरेदी केलेल्या गव्हाच्या किमतीतून, मुख्य खरेदी अभिकर्ता संस्था, सहकारी संस्थांच्या कर्जापोटी शेतकऱ्यांकडून ४० टक्के पर्यंत कर्जाची रक्कम वसूल करु शकेल. (टंचाई परिस्थितीत त्या संबंधातील आदेशाच्या अधिन राहून)

६.२ सदर योजनेत गहू खरेदी करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (Markfed) व महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांना जो अनुषंगिक खर्च द्यावयाचा आहे, त्याबाबतचा निर्णय स्वतंत्ररीत्या कळविण्यात येईल. परंतु त्या आदेशाची वाट न पाहता दोन्ही अभिकर्ता संस्थांनी गहू खरेदीची योजना त्वरित कार्यान्वित करावी.

६.३. कोणत्याही परिस्थितीत नॉन एफ.ए.क्यू. दर्जाचा गहू खरेदी करु नये. शेतकऱ्यांच्या माहितीसाठी गव्हाचे एफ.ए.क्यू. विनिर्देश, आधारभूत किंमती आणि अस्वच्छ / खराब गहू खरेदी केला जाणार नाही, या बाबींना स्थानिक वर्तमानपत्रे व इतर प्रसार माध्यमातून अभिकर्ता संस्थांनी व जिल्हाधिकाऱ्यांनी व्यापक प्रसिद्धी द्यावी.

६.४. आधारभूत किंमत ही एफ.ए.क्यू. गव्हासाठीच असेल. शेतकऱ्यांनी वाळविलेला व स्वच्छ केलेला गहू खरेदी केंद्रावर आणावा म्हणजे तो नाकारला जाणार नाही, अशीही व्यापक प्रसिद्धी स्थानिक वृत्तपत्रातून द्यावी.

६.५. खरेदी अभिकार्त्यांनी एफ.ए.क्यू. दर्जात न बसणारा गहू खरेदी केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी व येणाऱ्या नुकसानीची जबाबदारी ही सर्वस्वी खरेदी अभिकर्त्यांवर राहील. कमी दर्जाचा गहू खरेदी करण्याचा प्रयत्न केल्यास अशा कर्मचाऱ्यांवर / ग्रेडसर्वर अभिकर्ता संस्थांनी तातडीने कारवाई करावी.

६.६. भारतीय अन्न महामंडळाचे अधिकारी तसेच राज्य शासनाचे क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी खरेदी केंद्रांना भेटी देऊन नियमितपणे खरेदी होत आहे किंवा नाही, याची तपासणी करतील आणि त्यांनी दिलेला सल्ला विचारात घेऊन खरेदी अभिकर्ता संस्थांनी त्याप्रमाणे कार्यवाही/उपाययोजना करणे आवश्यक राहील.

६.७. गव्हाच्या दर्जावर कडक नियंत्रण ठेवण्यासाठी आवश्यक असलेली यंत्रसामग्री व पुरेसे प्रशिक्षित ग्रेडर्स नेमण्याची संपूर्ण जबाबदारी मार्केटिंग फेडरेशन / आदिवासी विकास महामंडळाची राहील.

६.८. सर्व खरेदी केंद्रावर प्रशिक्षित ग्रेडर्स नेमले गेले आहेत, याची जिल्हाधिकाऱ्यांनी व पुरवठा विभागाच्या अधिकाऱ्यांनी सुद्धा प्रत्यक्ष भेट देऊन खात्री करुन घ्यावी. ही केंद्रे चालविण्यासाठी उप अभिकार्त्यांची नेमणूक खरेदी अभिकर्ता संस्थांनी स्वतःच्या जबाबदारीवर करावी.

६.९ जिल्हाधिकाऱ्यांनी उप अभिकर्त्यांना प्राधिकारपत्र देऊ नयेत. उप अभिकार्त्यांच्या नेमणूकीशी शासनाचा काहीही प्रत्यक्ष सबंध राहणार नाही, याची नोंद घ्यावी.

६.१० जिल्हाधिकाऱ्यांनी गहू खरेदीच्या कालावधीत दर्जा नियंत्रण व दक्षता पथकाची स्थापना करावी व विशेष मोहीम राबवून नॉन एफ.ए.क्यू. गव्हाची खरेदी होण्यास जबाबदार असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांवर शिस्तभंगाची कारवाई करावी.

६.११. महाराष्ट्र कृषी उत्पन्न खरेदी (नियमन) नियम, १९६३ च्या नियम ३२ (ड) अन्वये कृषी उत्पन्न बाजार समितीच्या क्षेत्रात केंद्र शासनाच्या किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत जाहीर करण्यात आलेल्या हमी भावापेक्षा कमी दराने शेतकऱ्यांने उत्पादित केलेल्या उत्पादनाची खरेदी केली जाणार नाही, याबाबत बाजार समितीने दक्षता घेणे आवश्यक राहील. त्यानुसार "बाजार समितीने अशा प्रकारांना आळा घातला नाही तर, त्यांच्याविरुद्ध उपरोक्त नियमांच्या नियम ४५ अन्वये शासन योग्य ती कारवाई करु शकेल" ही बाब संबंधित जिल्हाधिकार्यांनी त्यांच्या क्षेत्रातील सर्व कृषी उत्पन्न बाजार समित्यांच्या नजरेस आणून द्यावी.

६.१२. आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत करण्यात येणाऱ्या धान्यातील पुर्वानुभावानुसार कृषी उत्पन्न बाजार समितीच्या क्षेत्रात आधारभूत किंमतीपेक्षा कमी भावाने झालेल्या खरेदी संदर्भात केंद्र शासनाकडून राज्य शासनाकडे कारणमिमांसा विचारण्यात येते व याबाबत संबंधितांचा खुलासा मागविल्यानंतर बहुतांशी अशी खरेदी नॉन एफ.ए.क्यू. दर्जाच्या धान्याची झालेली असल्याचे दिसून येते. मात्र, अशा कमी दराने होणाऱ्या खरेदी व्यवहाराबाबत कृषी उत्पन्न बाजार समित्यांनी संबधितांना खरेदी-विक्री दरांची माहिती देताना/अहवाल पाठविताना एफ.ए.क्यू. / नॉन एफ.ए.क्यू. दर्जाबाबत विनिर्दिष्टपणे माहिती न पुरविल्यामुळे बहुतांशी प्रकरणात केंद्र शासनाकडून राज्य शासनास पत्रव्यवहार करण्यात येतो. यास्तव, कोणत्याही बाजार समित्यांनी त्यांच्या क्षेत्रात खरेदी झालेल्या गव्हाचे दर कोणत्याही माध्यमाद्वारे प्रसिद्ध करताना किंवा कळविताना खरेदी-विक्रीचे दराबाबत एफ.ए.क्यू./नॉन एफ.ए.क्यू. दर्जाबाबतसुद्धा कोणत्याही परिस्थितीत उल्लेख करावा, अशाही सक्त सूचना सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या क्षेत्रांतील कृषी उत्पन्न बाजार समित्यांना

द्याव्यात. त्याच प्रमाणे त्यांच्या क्षेत्रातील खरेदी केंद्रावर आवश्यक त्या सोयी-सुविधा संबंधित समित्यांकडून उपलब्ध होतील या दृष्टीने अभिकर्ता संस्थांनी पहावे.

६.१३. आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत जाहीर केलेल्या गव्हाच्या किंमतीबाबत फलक ठळक अक्षरात दर्शनी भागात लावण्यासाठी कृषी उत्पन्न बाजार समित्यांना जिल्हाधिकाऱ्यांनी सक्त सूचना द्याव्यात व बाजार समित्यांनी याची काटेकोर अंमलबजावणी करावी. एफ.ए.क्यू. दर्ज्याचे गहू हमी भावापेक्षा कमी भावाने खरेदी होणार नाहीत, याची दक्षता द्यावी.

७. प्रसिद्धी :-

७.१. किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत असलेले दर, दर्जा, विनिर्देश, खरेदी केंद्रे, इ. ची माहिती शेतकऱ्यांना निश्चितपणे लक्षात येण्यासाठी हे दर दर्शविणारे भावफलक ग्राम पंचायत, तहसिल कार्यालय, गट विकास अधिकारी कार्यालय, इ. ठिकाणी दर्शनी भागात लावण्यात यावेत. तसेच, अशा माहितीस संबंधीत अभिकर्ता संस्थांनी व जिल्हाधिकाऱ्यांनी योग्य ती प्रसिद्धी देण्यासाठी स्थानिक वृत्तपत्रे, कापडी फलक इत्यादीचा वापर करावा.

७.२. खरेदी केंद्रावर गहू वळविणे, स्वच्छ करणे तसेच गव्हाची नासधूस होऊ न देणे यासाठी व खरेदी प्रक्रिया सुरळीतपणे होण्यासाठी आवश्यक त्या मुलभूत सुविधा खरेदी केंद्रावर उपलब्ध करुन देण्याची खबरदारी खरेदी अभिकर्ता संस्थांनी घ्यावी.

**८. खरेदी केंद्रे :-**

८.१ शेतकऱ्यांच्या सोयीच्या दृष्टीकोनातून तसेच गव्हाची आवक, खरेदी केंद्राची गरज इत्यादी बाबी विचारात घेऊन खरेदी केंद्र उघडण्यात यावीत. जिल्हाधिकारी यांनी निर्देशिल्याप्रमाणे खरेदी अभिकर्ता संस्थांनी आवश्यक त्या ठिकाणी गहू खरेदी करण्यासाठी खरेदी केंद्रे उघडावीत.

८.२ प्रत्येक खरेदी केंद्रावर खरेदी होणारा गहू निश्चित केलेल्या विनिर्देशाप्रमाणे असणे आवश्यक आहे. परंतु प्रसिद्धी देऊनही जर एखाद्या शेतकऱ्याने विनिर्देशाप्रमाणे कमी प्रतीचा गहू आणल्यास त्याच्याकडून सदरहू धान्याची प्रत विनिर्देशाप्रमाणे / सुधारीत करुन घेतल्यानंतरच, गहू खरेदी करावा.

८.३ शेतकऱ्यांना शक्यतो गहू परत घेवून जावा लागणार नाही यासाठी प्रत्येक खरेदी केंद्रावर चाळणी, पंखे, ताडपत्री, पोलीथीन शिट्स वैगेरेसारखी आवश्यक साधने उपलब्ध ठेवावीत.

८.४ खरेदीसाठी आवश्यक तेव्हढी वजनमापे, आद्रता मापक यंत्रे, बारदाना, सुतळी, इत्यादी साधने गहू खरेदी सुरु होण्यापूर्वी पुरेशा प्रमाणात केंद्रावर ठेवण्याची व्यवस्था करावी .

८.५ गव्हाचा नमुना तपासणीसाठी आवश्यक ती सर्व साधनसामग्री खरेदी केंद्रावर प्रत्यक्ष गहू खरेदी सुरु होण्यापूर्वी उपलब्ध असणे आवश्यक आहे. खरेदी केलेला गहू साठविण्यासाठी केंद्राच्या विनिर्देशाप्रमाणे

बारदाना वापरण्याबाबत केंद्र शासनाने दिलेल्या सूचना विचारात घेण्यात याव्यात. या गोणीचे वजन व दर्जा यानुसार खरेदी केंद्राला बारदाना पुरवठा होत असल्याची संबंधित अभिकर्ता संस्थांच्या अधिकाऱ्यांनी स्वत: खात्री करुन घ्यावी.

८.६ जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांनी ज्या बारदानांमध्ये गहू भरलेला आहे, तो विहित प्रमाणाप्रमाणे आहे अथवा नाही, याची स्वत: खात्री करुन घ्यावी. जेथे शक्य असेल तिथे बारदानांचा पुरवठा होत असतानाच जिल्हा पुरवठा अधिकारी व खरेदी अभिकर्ता प्रतिनिधी यांनी संयुक्तपणे तपासणी करावी. या तपासणीत कमी प्रतीची बारदाने दिसून आल्यास ती नाकारावीत. कमी प्रतीचे बारदान वापरण्यात आल्याबाबत कोणतीही तक्रार शासनाकडे येणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८.७ **गव्हासाठी फक्त ५० किलो क्षमतेचा बारदाना वापरण्यात यावा.**

**९) खरेदी पध्दत:-**

प्रत्येक गाव एका विशिष्ट खरेदी केंद्रास जोडण्यात यावे. सदर गावातील शेतकरी जर दुसऱ्या खरेदी केंद्रावर गहू घेवून गेला तर, त्या केंद्रावर त्याचा गहू खरेदी करु नये. खरेदी केंद्रे व प्रत्येक खरेदी केंद्रास जोडण्यात आलेल्या गावांची नावे यासंबंधी पुरेशी प्रसिध्दी देण्याबाबत जिल्हाधिकारी आणि खरेदी अभिकर्त्यांनी खबरदारी घ्यावी. शेतकऱ्यांकडील गहू खरेदी करताना Online खरेदी पध्दतीने करावयाची असल्यामुळे संबंधित शेतकऱ्यांची नोंदणी करणे आवश्यक राहील. त्याकरिता Online नोंदणी, आधार क्रमांक व बचत बँक खाते क्रमांकाची नोंदणी करणे आवश्यक राहील. सदर खरेदीकरिता NeML NCDEX Group Company यांच्या Platform वर नोंदणी करण्यात यावी. केंद्र शासनाच्या निर्देशांप्रमाणे Online नोंदी PFMS (Public Fund Monitoring System) मध्ये करणे अनिवार्य आहे. शेतकऱ्यांकडील जमिनीबाबतचा ७/१२ चा उतारा पाहूनच गहू खरेदी करण्यात यावा. सदरहू उताऱ्यात गव्हाखालील क्षेत्राची नोंद आहे, याची खात्री करुन घ्यावी. तसेच ७/१२ उताऱ्यासंबंधीची नोंद पावतीच्या मागील बाजूस घ्यावी. ७/१२ उताऱ्याची प्रत शेतकऱ्यांना परत करु नये. खरेदी केंद्रावर विक्रीसाठी शेतकऱ्यांने आणलेल्या गव्हाच्या अनुषंगाने गावनिहाय रजिस्टर तयार करावे. त्यामध्ये १) शेतकऱ्याचे नाव २) सर्व्हे / गट क्रमांक व क्षेत्रफळ, ३) केंद्रात विक्रीस आणलेल्या गव्हाच्या माहितीचा समावेश असावा. त्यामुळे पुन्हा गहू आणल्याबरोबर या नोंदवहीवरुन पूर्वी दिलेला ७/१२ चा उतारा काढून, शेतकऱ्यांनी आणलेला गहू त्याच्या स्वत:च्या उत्पादनातील आहे, याची खात्री करुन घेता येईल. ट्रकने वा तत्सम वाहनातून आणलेला गहू स्विकारण्यापूर्वी सदर धान्य त्याच शेतकऱ्याचे आहे, याची पूर्णपणे खात्री करुन घ्यावी. काही ठिकाणी धान्याखालील क्षेत्र व सरासरी उत्पादकता याचा विचार न करता फार मोठया प्रमाणावर (अप्रत्यक्षपणे व्यापाऱ्यांचे) धान्याची खरेदी केली जाते असे निदर्शनास आले आहे. यास्तव शेतकऱ्यांचे ७/१२ उताऱ्यानुसार पीकाखालील क्षेत्र, या वर्षीची पीक परिस्थिती (पैसेवारी), पीकाचे सरासरी उत्पादन या बाबी विचारात घेऊन गहू खरेदी करण्यात यावा. जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी त्यांच्या संबंधित जिल्ह्यातील जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचेकडून गव्हाची

जिल्हानिहाय उत्पादकता प्राप्त करुन घेऊन ती दोन्ही अभिकर्ता संस्थांना कळवावी. सदर उत्पादकतेच्या आधारावरच गव्हाची खरेदी केली जाईल याची दक्षता दोन्ही अभिकर्ता संस्थांनी घ्यावी.

रोज सायंकाळी खरेदी केंद्र बंद झाल्यानंतर खरेदी केंद्रावर आणलेला, परंतु खरेदी न झालेला गहू सांभाळण्याची जबाबदारी संबंधित शेतकऱ्याचीच राहील, अशीदेखिल प्रसिध्दी द्यावी. व्यापाऱ्यांकडून गतवर्षीचा जुना गहू पुन्हा खरेदी केंद्रावर विकला जाण्याची शक्यता विचारात घेऊन गतवर्षाचा जुना गहू कोणत्याही स्थितीत खरेदी केला जाणार नाही व केवळ शेतकऱ्यांकडून उत्पादित झालेला नवीन गहू खरेदी केला जाईल याची अभिकर्त्यांनी विशेष खबरदारी घ्यावी. जुना तसेच बिगर शेतकऱ्यांकडून गहू खरेदी झाल्यास त्याची पूर्ण जबाबदारी अभिकर्त्यावर राहील.

**<u>१०) खरेदी केलेल्या गव्हाची साठवणूक :-</u>**

**१०.१** खरेदी केलेला गहू अभिकर्ता संस्थांनी स्वत:च्या गोदामांमध्ये साठवावा. सदर गहू जिल्हा पुरवठा अधिकारी यांचेकडे सुपूर्द करेपर्यंतची सर्व जबाबदारी दोन्ही अभिकर्ता संस्थांची असेल. सदर गहू अभिकर्ता संस्थांनी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांचेकडे दर्जा तपासणी व वजन करुन जमा केल्यानंतर, अशा धान्याची साठवणूक, सुस्थितीत ठेवणे, गरजेनुसार जिल्हांतर्गत वाहतूक/धुरीकरण इत्यादीची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी यांची असेल. यासंदर्भातील नोंदी जिल्हा पुरवठा अधिकारी कार्यालयाने गोदाम लेख्यामध्ये नियमितपणे घ्याव्यात. धान्यसाठा उघडयावर साठविण्याची गरज उद्भवल्यास तो साठविण्यापूर्वी अशा अन्नधान्याच्या थप्प्याखाली व आजूबाजूस ड्रेनेज पुरवून त्यावरुन पूर्णपणे पुरेशा ताडपत्र्यांनी झाकून ठेवण्याची व्यवस्था करावी. तसेच गरजेनुसार नियमित ठेकेदाराकडून वेळीच धुरीकरण करुन धान्याचे किडीपासून संरक्षण करावे. कोणत्याही परिस्थितीत उघडयावर साठविण्यात आलेला धान्याचा साठा पावसामुळे भिजणार नाही व धान्य थप्प्यांना खालून किंवा बाजूने ओल लागणार नाही व पावसाळयात सुध्दा असा साठा उघडयावर राहीला तरी धान्य खराब होणार नाही, याची दक्षता घेवूनच गोदामाबाहेर असलेल्या धान्याच्या सुरक्षिततेची प्रथम पासूनच व्यवस्था करावी. याबाबत **परिशिष्ट "ब"** मधील शासन पत्र, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. संकीर्ण-१२९ /१५/प्र.क्र.२५७९/ना.पु.२९, दिनांक ३ ऑगस्ट, १९९८ अन्वये विहित केलेल्या संहितेचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

**१०.२** जिल्हाधिकारी / जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी गहू ताब्यात घेताना तो FAQ दर्जाचा आहे, याची प्रत्यक्ष खातरजमा करावी. तसेच, याबाबतचे प्रमाणपत्र भारतीय अन्न महामंडळाकडे पाठवावे.

**१०.३** गहू खरेदी कालावधी संपल्यानंतर एका आठवडयाच्या आत गोदामनिहाय साठविण्यात आलेल्या गव्हाचा तपशील शासनास सादर करण्यात यावा. यासोबत सदरचा गहू FAQ दर्जाचा असल्याबाबतच्या प्रमाणपत्राची प्रत देखील सादर करण्यात यावी.

**१०.४** किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेला गव्हाची विल्हेवाट भारतीय अन्न महामंडळाकडून लावण्यात येत होती. तथापि, रब्बी पणन हंगाम २०२०-२१ पासून राज्यात विकेंद्रित

खरेदी योजना अंमलात येत असल्याने, सदर गव्हाची विल्हेवाट राज्य शासनाचे स्तरावत लावली जाणे अपेक्षित आहे. यास्तव राज्य शासनामार्फत खरेदी केलेल्या गव्हाबाबत उचित कार्यवाही करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

**११) कलर कोडींग :-**

रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये खरेदी करण्यात येणाऱ्या गव्हाच्या गोण्यांवरील कलर कोडींग शासन पत्र क्र.संकीर्ण-२६१९/४७२/प्र.क्र.१०८/नापु.२९, दि. २२ नोव्हेंबर, २०१९ नुसार करण्यात यावे. **(परिशिष्ट "क")** (केंद्र शासनाच्या दिनांक १३.११.२०१९ च्या पत्रासह)

**१२) खरेदीचा कालावधी:-**

रब्बी पणन हंगाम २०२०-२१ गहू खरेदी कालावधी - दि. १ जुलै, २०२० ते दि.३१ जुलै, २०२०

**१३) गहू खरेदीची किंमत प्रदान करणे व खर्चाची प्रतिपूर्ती:-**

**१३.१** लाभार्थ्यांचे प्रदान Online करण्याबाबत केंद्र शासनाचे निर्देश आहेत. ही बाब विचारात घेता अभिकर्ता संस्थांनी त्यांच्या मुख्यालयातून थेट शेतकऱ्यांच्या बँक खात्यामध्ये खरेदीची पूर्ण रक्कम जमा करावी. कोणत्याही परिस्थितीत सदर रक्कम खरेदी केलेल्या दिवसापासून पुढील सात दिवसांच्या आत शेतकऱ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करणे आवश्यक राहील.

**१३.२** शासनाच्या अभिकर्ता संस्थांनी शेतकऱ्यांकडून खरेदी केलेल्या गव्हाची किंमत शेतकऱ्यांना त्वरित प्रदान करावी. गव्हाच्या बाबतीत खरेदी अभिकर्त्यांना वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या कार्यालयाने, अभिकर्ता संस्थांकडून साप्ताहिक खरेदी विवरणपत्र व धान्य शासकीय गोदामात जमा झाल्याचा पुरावा प्राप्त होताच, खरेदी केलेल्या गव्हाची पुर्ण किंमत प्रदान करावी. ही रक्कम विनाविलंब अदा करणे वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयाला शक्य व्हावे म्हणून गव्हाची स्वीकृती पत्रे खरेदी अभिकर्ता संस्थांनी दर आठवडयाला वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयास विनाविलंब सादर करावीत. अभिकर्ता संस्थांनी गहू जमा केल्याचे रुजवात पत्र सादर केल्यानंतर केंद्र शासनाने मंजूर केलेल्या दराने अनुषंगिक खर्चाची अदायगी करण्यात यावी. हंगाम संपल्यानंतर १२ महिन्यांच्या आत अंतिम लेखापरिक्षित विवरणपत्रे सादर करण्याची जबाबदारी अभिकर्ता संस्थांची राहील.

**१३.३** अभिकर्ता संस्थांनी या योजनेंतर्गत खरेदी केल्या जाणाऱ्या गव्हासाठी संबंधित शेतकऱ्यांच्या ७/१२ उताऱ्याच्या प्रती तसेच इतर मूळ अभिलेखे त्यांच्या कार्यालयात ठेवावे. गहू खरेदी प्रदानाच्या संदर्भात अतिप्रदान किंवा चुकीची देयके सादर करुन रकमा अदा केल्या जाणार नाहीत, याबाबतची सर्वस्वी

जबाबदारी अभिकर्ता संस्थेची राहील. अभिकर्ता संस्थेने या योजनेंतर्गत खरेदी केल्या जाणाऱ्या गव्हासाठी वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालयात प्रतिपूर्तीचे दावे सादर करतांना साप्ताहिक खरेदी विवरणपत्र, फॉर्म 'बी' व 'सी' सोबत खालीलप्रमाणे प्रमाणपत्र सादर करावे :-

"प्रमाणित करण्यात येते की, दाव्यात दर्शविलेल्या रकमांचे यापूर्वी प्रदान करण्यात आलेले नाही. सदर दाव्यातील परिगणना खरेदी केंद्रे / संबंधित कार्यालयात ठेवण्यात आलेल्या मूळ अभिलेख्यावरुन पडताळणी करण्यात आलेली असून अनुज्ञेय रकमांचे दावे सादर करण्यात आलेले आहेत. सदर प्रदानात जादाचे किंवा चुकीचे प्रदान झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी अभिकर्त्याची राहील व त्यानुसार वसूल प्राप्त रकमा तात्काळ वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालयास परत करण्यात येतील किंवा पुढील दाव्यातून वसूल करण्यात याव्यात."

केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशांनुसार महिनानिहाय साठा विवरणपत्र, बारदाना लेखे, गोदामभाडे करार, वाहतूक भाडेदरपत्रक इ. आवश्यक दस्तऐवज अभिलेखित करावेत.

**१३.४** दोन्ही अभिकर्ता संस्था, आवश्यक असल्यास भारतीय रिझर्व्ह बँकेकडून सवलतीच्या दराने कॅश क्रेडीट लिमिट मिळण्यासाठी प्रस्ताव करु शकतील. असा प्रस्ताव त्यांनी पाठविल्यास केंद्रीय अन्न मंत्रालयामार्फत अशी कॅश क्रेडिट मिळवून देण्यासाठी हा विभाग शिफारस करेल.

**१३.५** अभिकर्ता संस्थांनी आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत गहू खरेदीबाबतचे स्वतंत्र लेखे ठेवणे व अनुषंगिक माहिती सादर करण्याबाबतच्या सविस्तर सूचना वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या कार्यालयाकडून तात्काळ देण्यात याव्यात.

**१४)** प्रस्तुत योजनेमधील गहू खरेदीवर होणाऱ्या खर्चाची केंद्र शासनाकडून प्रतिपूर्ती होईपर्यंत यावरील सर्व खर्च वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयाच्या वैयक्तीक ठेव लेख्यातुन मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८-अन्न साठवण व वखार साठवण यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न, १०१-प्रापण व पुरवठा, (०२) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण, (०२)(१२) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत योजनेखालील भरडधान्य/धान खरेदी (अनिवार्य) (४४०८ ०३८२) २१, पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली तसेच अनुषंगीक खर्च हा मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार साठवणूक यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न, १०१-प्रापण व पुरवठा (०२) प्रापण व वितरण व किंमत नियंत्रण (०२)(१३) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत योजनेखालील भरडधान्य/धान वरील अनुषंगीक खर्च (अनिवार्य) (४४०८०३९१) ५०, इतर खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. अभिकर्ता संस्थांनी विकेंद्रीत खरेदी योजनेंतर्गत गव्हाच्या खरेदीबाबतचे स्वतंत्र लेखे ठेवणे व अनुषंगिक माहिती सादर करण्याबाबतच्या सविस्तर सूचना वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयाकडू तात्काळ देण्यात याव्यात.

**१५) कंट्रोल रुम:-**

अ) आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात येणाऱ्या गव्हाचा नियमित अहवाल केंद्र शासन/ भारतीय अन्न महामंडळास पाठविण्यासाठी अवर सचिव , अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या नियंत्रणाखाली कंट्रोल रुमची स्थापना करण्यात यावी येत आहे. स्थापन करण्यात येणाऱ्या कंट्रोल रुमचा पत्ता खालीलप्रमाणे राहील :-

अवर सचिव , (MSP)
अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
मंत्रालय (विस्तार ), मुंबई
दूरध्वनी क्र. ०२२- २२७९३०४५/ २२०२४९९४
E-mail: netra.mankame@nic.in

ब) अभिकर्ता संस्थांनी दररोजचा जिल्हानिहाय खरेदी अहवाल सायंकाळी ५.३० पर्यंत वरील कंट्रोल रुमला पाठवावा. संबंधित जिल्हाधिकारी व खरेदी अभिकर्त्यानी दर शनिवारी सायंकाळपर्यंत खरेदी करण्यात आलेल्या गहू खरेदीचा साप्ताहिक अहवाल परिशिष्ट **"ड"** मधील नमुन्यात शासनास सदर करण्यात यावा.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२००७०७११०३४८३३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2020.07.15 16:30:45 +05'30'

**( मनोजकुमार सुर्यवंशी )**
शासनाचे सह सचिव

**सहपत्र** :- परिशिष्ट “अ”, “ब”, “क” व “ड”

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहकसंरक्षण यांचेखाजगीसचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा.राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अपरमुख्यसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव, कृषि व प.दु.म.विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधानसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को. ऑप. मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
आदिवासीविकासभवन, २ रामाळा, रामगणेशगडकरीचौक, जुनाआग्रारोड,नाशिक-२,.
१९) सर्व विभागीय आयुक्त.
२०) नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
२१) सर्व जिल्हाधिकारी.
२२) सर्व उप आयुक्त (पुरवठा).
२३) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
२४) सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.
२५) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२६) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२७) सर्व उपसचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी, अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई.
२८) सरव्यवस्थापक, (महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, राजेंद्रनगर, दत्तपाडारोड, बोरीवली पूर्व मुंबई-०६६.
२९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ).
३०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वामजला, विधानभवन, मुंबई. (१०प्रती).
३१) मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये ( प्रत्येकी ५ प्रती ).
३२) सर्व विधानपरिषद सदस्य व विधानसभा सदस्य
३३) सर्व विरोधी पक्षनेते.
३४) निवडनस्ती (नापु-२९).

************

## शासन निर्णय, क्र.विकेंख-१०१९/प्र.क्र.७५/नापु-२९, दि. ०७ जुलै, २०२० चे सहपत्र

## परिशिष्ट- "अ"

(रब्बी हंगाम २०२०-२१ मध्ये खरेदी करावयाच्या गव्हाचे विनिर्देश)

No.7-8/2019-S&I
Government of India
Ministry of Consumer Affairs, Food & Public Distribution
Department of Food & Public Distribution
******

Krishi Bhawan, New Delhi
Dated: 27.03.2020

To,

The Secretary,
Food & Civil Supplies Department,
Government of.........................
(All State Governments/UT Administrations)

Sub: **Uniform specifications of Wheat and Barley for Rabi Marketing Season (RMS) 2020-21.**

Sir,

I am directed to forward herewith Uniform specifications of Wheat and Barley for procurement under Central Pool during Rabi Marketing Season (RMS) 2020-21.

It is requested that the procurement of Wheat & Barley stocks by all procuring agencies should be ensured strictly in accordance with the uniform specification. It is also requested that wide publicity of the Uniform Specifications and Minimum Support Price (MSP) be made among the farmers in order to ensure that they get due price for their produce and rejection of the stocks is avoided. The farmers may also be advised to offer only dry and clean stocks.

Receipt of this communication may please be acknowledged.

Encl: as above

Yours faithfully

(Vishwajeet Haldar)
Deputy Commissioner (S&R)
Tele # 23382820

Copy to: -

1. The Chairman and Managing Director, Food Corporation of India (FCI), New Delhi.
2. Executive Director (Commercial)/Executive Director (QC), FCI HQ, New Delhi.
3. General Manager (QC)/GM (Marketing & Procurement), FCI, HQ, New Delhi.
4. All Executive Director (Zones), FCI.
5. Managing Director, CWC, New Delhi.
6. The Secretary, Department of Agri. & Coop, Krishi Bhawan, New Delhi.
7. Sr. PPS to Secretary (F&PD)/PPS to AS&FA/JS (P&FCI)/JS (Impex, SRA & EOP) / JS (Stg.)/JS (BP&PD).
8. Director (P)/Director (FCI)/Director (PD)/ Director (Mov.)/Director (Finance)/DC (S&R).
9. All QCC/IGMRI offices.
10. US (Py. I, II, III, IV)/US (FC A/c).
11. AD (S&I)/AD (QC)/AD (Lab).
12. Director (Technical), NIC with the request to put the information in the Ministry's website.

## UNIFORM SPECIFICATION FOR INDIAN WHEAT OF ALL VARIETIES FOR RABI MARKETING SEASON 2020-2021

Wheat shall:

a. be the dried mature grains of *Triticum vulgare*, *T. compactum*, *T. sphaerococcum*, *T. durum*, *T. oestivum* and *T. dicoccum*.

b. have natural size, shape, colour and lustre.

c. be sweet, clean, wholesome and free from obnoxious smell, discolouration, admixture of deleterious substances including toxic weed seeds and all other impurities except to the extent indicated in the schedule below.

d. be in sound merchantable condition.

e. not have any admixture of *Argemone mexicana* and *Lathyrus sativus* (khesari) in any form, colouring matter and any obnoxious, deleterious and toxic material.

f. Conform to Food Safety and Standards Act/ Rules (formerly PFA).

**Schedule showing the maximum permissible limits of different refractions in Fair Average Quality of Wheat.**

| Foreign Matter % | Other food grains % | Damaged grains % | Slightly damaged grains % | Shriveled & Broken grains % |
|---|---|---|---|---|
| 0.75 | 2.00 | 2.00 | 4.00 | 6.00 |

**NOTE:**

1. Moisture in excess of 12% and upto 14% will be discounted at full value. Stocks containing moisture in excess of 14% are to be rejected.
2. Within the overall limit specified for foreign matter, the poisonous weed seeds shall not exceed 0.4% of which Dhatura and Akra (Vicia species) shall not be more than 0.025% and 0.2% by weight respectively.
3. Kernels with glumes will not be treated as unsound grains during physical analysis, the glumes will be removed and treated as organic foreign matter.
4. Within the overall limit specified for damaged grains, ergot affected grains shall not exceed 0.05 %.
5. In case of stocks having living infestation, a cut at the rate of Rupee two per quintal may be charged as fumigation charges.
6. For weevilled grains determined by count, stocks containing weevilled grains in excess of 1% will be rejected. The rate of cut for weevilled grains will be @ Rs.2 per quintal.

**Method of Analysis**

44

As given in Bureau of Indian Standard No. IS. 4333 (Part I and II) 1967 and as amended from time to time except for weevilled grains which are to be determined by count method.

**DEFINITIONS OF REFRACTIONS:**

As contained in BIS Specifications No. 2813-1995 and as amended from time to time.

============

## शासन निर्णय, क्र.विकेंख-१०१९/प्र.क्र.७५/नापु-२९, दि. ०७ जुलै, २०२० चे सहपत्र

## परिशिष्ट- "ब"

क्रमांक:संकीर्ण- १२९८/२८१५/प्र.क्र.२५७९/ना.पु.२९,
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३ ऑगस्ट, १९९८.

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
सर्व अपर जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.

**विषय :** खुल्या जागेत शास्त्रोक्त पध्दतीने अन्नधान्याची साठवणूक करण्याबाबत संहिता.

राज्यात वेळोवेळी आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत तसेच लेव्ही आदेशातंर्गत अन्नधान्याचे प्रापण करण्यात येते. अशाप्रकारे खरेदी करण्यात येणारे अन्नधान्य शासकीय किंवा भाडयाने घेतलेल्या गोदामात सुरक्षित साठविण्यात येते. त्या अन्नधान्याच्या सुरक्षिततेविषयी दयावयाच्या खबरदारीची संहिता यापूर्वीच विहित करण्यात आली आहे.

२. काही विशिष्ट परिस्थितीत शासनाच्या ताब्यात असलेले अन्नधान्य गोदामात साठविणे शक्य झाले नाही (गोदामात जागा नसल्यामुळे) व त्यामुळे असे अन्नधान्य खुल्या जागेत (cover and plinth) साठवावे लागल्यास, त्यावेळी संभाव्य नुकसान टाळून अन्नधान्याची शास्त्रोक्त पध्दतीने साठवणूक करण्याबाबतची उपरोक्त उपयोजन संहिता केंद्र शासनाने निश्चित केलेली आहे. ती पुढीलप्रमाणे आहे :-

(१) खुल्या आवारात (Cover and plinth) साठवणूकीसाठी निवडलेल्या जागा हया उंच जोत्याच्या, (High Plinth Area) विशेषत: पक्क्या बांधकामाच्या असाव्यात. पुरेसा निचरा होणा-या असाव्यात. जोत्याच्या बांधकामामध्ये तडे गेलेले नसावेत किंवा भेगा नसाव्यात. अशा आवारांच्या सभोवती अनावश्यक रानटी वनस्पती नसाव्यात आणि अशा जागा सुलभ रस्त्यांनी जोडलेल्या व पुरेशा सुरक्षित असाव्यात.

(२) खुल्या आवारातील (cover and Plinth) साठवणूक करताना योग्य ड्रेनेजच्या (लाकडी ठोकळे, दगडी लाद्या, इत्यादी) वापर करावा.

(३) अन्नधान्याचे निरिक्षण करण्यासाठी तसेच कीटकांच्या नियंत्रणाचे उपाय योजण्यासाठी जोत्याच्या भोवती पुरेशा मार्गिका व जागा असाव्यात.

(४) थप्प्या हया प्रमाणशीर आकाराच्या, उंचीच्या आणि घुमटाकार असाव्यात. त्यामुळे आवरणाचा फुगा होणे (Ballooning of Cover) तसेच थप्प्याच्या वर पाणी साठणे टाळता येईल.

(५) उंदिराच्या बंदोबस्ताची काळजी वेळच्यावेळी घेण्यात यावी. उंदीर नियंत्रणासाठी ॲल्युमिनियम फॉस्फाईडच्या गोळयांच्या (०.३ ग्रॅमच्या दोन गोळया प्रत्येक जिवंत बिळासाठी) वापर करावा. झिंक फॉस्फाईडचा सुध्दा अमिषाच्या माध्यमातून वापर करता येईल.

(६) पक्ष्यांपासून अन्नधान्याच्या सुरक्षिततेची पुरेशी काळजी घेण्यात यावी

(७) पुरेशा प्रकाशाच्या दिवशी योग्य वायुविजन असणे अन्नधान्यातील आर्द्रता कमी करण्यासाठी उपयुक्त ठरते.

(८) पावसापासून अन्नधान्याचे रक्षण करण्यासाठी खुल्या आवारातील (Covers and Plinth) साठवणीच्या थप्प्या पॉलिथिनच्या आवरणाने आणि नॉयलॉनच्या जाळयांनी आच्छादित कराव्यात व आच्छादन नायलॉनच्या दोराने बांधावीत.

(९) खुल्या आवारात (Covers and Plinth) साठविलेल्या अन्नधान्यास ५० टक्के मॅलाथिऑन फवारुन २.५ टक्के डेस्टामेथीन पावडरच्या सहाय्याने तसेच ॲल्युमिनियम फॉस्फाईडच्या गोळयांच्या सहाय्याने धुरीकरण करुन अन्नधान्याच्या साठवणूकीतील किडींपासून संरक्षण करावे.

(१०) वा-याच्या वेगामूळे किंवा इतर कारणाने आवरणाची हानी झाल्यास तात्काळ उपयोगासाठी काळया पॉलिथिन आवरणाचा व नायलॉनच्या दोराचा पुरेसा साठा ठेवण्यात यावा.

(११) खुल्या आवारात (Cover and Plinth) साठविलेल्या धान्याचे प्राथम्याने नियतन द्यावे/वितरण करावे.

३. भविष्यात अशाप्रकारे अन्नधान्याची खुल्या जागी (Open place) साठवणूक करावी लागल्यास त्या अन्नधान्याचे नुकसानीपासून रक्षण करण्यासाठी उपरोक्त परिच्छेद -२ मध्ये विहित केलेल्या उपयोजन संहितेचे पालन करण्यात यावे.

४. याबाबत आपल्या अधिपत्याखालील सर्व संबंधितांना योग्य त्या सूचना देण्यात याव्यात व त्याचे पालन होत असल्याची खात्री करण्यात यावी.

सही/-

(श्या. द. शिंदे)
उप सचिव,
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

प्रत अग्रेषित -१) महाराष्ट्र राज्य पणन महासंघ, मुंबई.

२) पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.

३) सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

## शासन निर्णय, क्र.विकेंख-१०१९/प्र.क्र.७५/नापु-२९, दि. ०७ जुलै, २०२० चे सहपत्र

### परिशिष्ट- "क"

महाराष्ट्र शासन

तात्काळ/ महत्वाचे

क्र : संपवीर्ण-२६१९/४७२/प्र.क्र.१०८/नापु.२९
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१९.

प्रति,

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि.,फनगूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई-४०० ००९.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक-२.
३) महा व्यवस्थापक (महाराष्ट्र) भारतीय अन्न महामंडळ,५ वा माळा, दत्तपाडा रोड, राजेंद्र नगर, बोरीवली (पूर्व), मुंबई -४०००६६.
४) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून).

विषय :- Colour Coding of Gunny Bags to facilitate identification of crop year of stock for RMS 2020-21

संदर्भ :- भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. 15(1)/2012-PY-III- Part (1), Dated 13.11.2019.

उपरोक्त विषयांकीत संदर्भाधीन पत्रान्वये केंद्र शासनाने "रब्बी पणन हंगाम २०२०-२१" साठी निळया रंगांचे कोडींग केलेल्या (BLUE Colour Coding ) गोण्यांचा वापर करण्याबाबतच्या सूचना दिलेल्या आहेत. (प्रत सोबत जोडली आहे)

२. तरी केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचनांप्रमाणे रब्बी पणन हंगाम २०२०-२१ मध्ये गोण्यांच्या कलर कोडींगबाबत काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी, ही विनंती.

सहपत्र : वरीलप्रमाणे

२२.११.१९
(नि. ज. गारोळे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत माहितीसाठी:-
१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व उप आयुक्त (पुरवठा)
३) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
४) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
५) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
६) पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
७) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा ( मो/पा), मुंबई.
८)कार्यासन नापु.२९ संग्रहार्थ.

C:\Users\... \Desktop\नापु-२९ ... Colour Coding\... RMS २०२०-२१ - Copy.docx

File No.15(1)/2012-PY-III-Part(1)

No.15(1)/2012-Py.III (E.File.367559).
Government of India
Ministry of Consumer Affairs, Food & Public Distribution
Department of Food & Public Distribution
(Policy-3 Section)
*****

Krishi Bhavan, New Delhi.

To

Dated 13/11/2019

The Secretary,
Food & Civil Supplies Department,
Government of Andhra Pradesh, Assam, Bihar, Chhattisgarh, Gujarat, Haryana, Himachal Pradesh, Jammu & Kashmir, Jharkhand, Karnataka, Madhya Pradesh, Maharashtra, Nagaland, Tripura, Orissa, Punjab, Rajasthan, Tamil Nadu, Telangana, Uttaranchal, Uttar Pradesh, West Bengal, Andaman & Nicobar Islands, Chandigarh, Delhi and Puducherry.

**Sub: Colour Coding of Gunny Bags to facilitate identification of crop year of stock for RMS 2020-21.**

Sir/Madam,

I am directed to say that it has been decided with the approval of Competent Authority to adopt BLUE Colour Coding for gunny bags for RMS 2020-21. The colour coding will be in the manner as indicated below:

a. Stencil or Branding as per indenters' requirements shall be in "BLUE" colour.

b. Marking or stitching on the mouth of the bag after filling the grain will be done by the FCI/State Agencies in "BLUE" colour.

c. For identification marking of marketing season, there will be Color Coded strip/s on every Jute bag. Width of each strip will be of 4 threads. Each strip will be running along the length of the Bag and shall be in "BLUE" color.

<u>For bags to be supplied through Jute Commissioner of India.</u>

d. (i) Single strip is to be printed for bags to be supplied through Jute Commissioner of India. This single strip shall be printed at a distance of about 150 mm away from any selvedge of the bag.

d (ii) For supply of jute bags to Andhra Pradesh, Telangana, Tamil Nadu, Kerala and Karnataka through Jute

File No.15(1)/2012-PY-III-Part(1)

Commissioner of India, an additional Black colour strip will be printed on each bag at a distance of about 150 mm away from other selvedge of the bag.

**For bags not purchased through Jute Commissioner of India.**

e. For jute bags not purchased through Jute Commissioner of India, two strips shall be printed on each bag. Each of two strips shall be printed at a distance of about 150 mm away from the respective selvedges of each bag.

2. This issues with the approval of Competent Authority.

Yours faithfully,

(Devendra S.Uikey)
**Deputy Secretary (Py.III)**
**Ph: 011-2338 3924**

Copy to:-

1. The Chairman, FCI, New Delhi.
2. ED (Proc) FCI, New Delhi.
3. Jute Commissioner, Kolkata.
4. Chairman, IJMA, Kolkata.

367559

**शासन निर्णय, क्र.विकेंख-१०१९/प्र.क्र.७५/नापु-२९, दि. ०७ जुलै, २०२० चे सहपत्र**

**परिशिष्ट- "ड"**

हमी भाव योजनेखाली एफ.ए.क्यू दर्जाच्या गहू खरेदीबाबतचा साप्ताहिक अहवाल नूमना.

१) जिल्ह्याचे नांव :- ---------------------------------------------

२) मागील शनिवार :- ------------------------------------------ (आकडे क्विंटलमध्ये)
दिनांक ---------------- अखेर गहू
झालेली एकूण खरेदी एफ.ए.क्यू.--------------------------

३) मागील शनिवारी दिनांक ---------------------- अखेर झालेली एकूण खरेदी.

४) अडचण असल्यास ----------------------------------------------------------------
--------------------------------------------------------------------------------

****************